शैक्षणिक वर्ष २०१० -११
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
नवीन विद्याशाखांना मान्यता (दुसरी या

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०१०/(२२७/१०)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै २०१०

**पहा:-** १) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.१.२०१०, व दि. ३.४.२०१० (Task Force)
२) शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.३.२०१०, (Task Force)
३) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्र. अमवि २०१०/कोवि/ प्रस्ताव १०-११/
अ.क.ड. / मवि २-३ / १७४० दिनांक १९.६.२०१०

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी अस्तित्वा असलेल्या महाविद्यालयात विद्याशाखा मान्यतेसाठी प्रस्ताव शासनाकडे सादर करावयाचे असतात, त्यानुसा शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी राज्यातील विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची अनुक्रमे शासन निर्णय व शासन पत्र क्रमांक-एनजीसी२०१०/ (७/१०) / मशि-४, दि. १५.१.२०१०, ३.४.२०१० व दि. १५.३.२०१० अन्वर स्थापित कृतिसमितीद्वारे छाननी करण्यात आली. कृती समितीचे अभिप्राय / शिफारशी व विद्यापीठाच्या शिफारश विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन विद्याशाखां खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नाव | मान्यता दिलेल्या विद्याशाखा |
|---|---|---|
| | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | माणगांव शिक्षण प्रसारक मंडळाचे कला व विज्ञान वरिष्ठ महाविद्यालय, माणगांव, जि.रायगड | वाणिज्य व बीएमएस |
| २. | ओरिएंटल एज्युकेशन सोसायटीचे कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, सानपाडा, नवी मुंबई | बीएससी (हॉस्पिटॅलिटी स्टडीज), बीएमएम (इंग्रजी) |
| ३. | रिगल एज्युकेशन सोसायटीचे रिगल कॉलेज ऑफ हॉटेल मॅनेजमेंट व टूरिझम, चिपळूण, जि.रत्नागिरी | बीकॉम (फायनॅन्शियल मार्केट) |
| ४. | समाज हितकारिणी संस्था संचालित उत्कर्ष कला व वाणिज्य महाविद्यालय, मु.पो.वासिंद, ता.शहापूर, जि.ठाणे | बीएससी (आयटी) |

| | | |
|---|---|---|
| ५. | मुंब्रा शिक्षण प्रसारक मंडळाचे जी.आर.पाटील कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, सोनारपाडा, डोंबिवली (पूर्व), जि.ठाणे | बीकॉम (अकौंटिंग ॲण्ड फायनान्स), बीएमएम (इंग्रजी माध्यम) बीएससी (हॉस्पिटॅलिटी स्टडीज |
| ६. | मुंब्रा शिक्षण प्रसारक मंडळाचे जी.आर.पाटील कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, पोलीस स्टेशनच्या मागे, मुंब्रा, जि.ठाणे | बीकॉम (फायनॅन्शियल मार्केट) बीएससी (हॉस्पिटॅलिटी स्टडीज |
| ७. | चिल्ड्रेन वेल्फेअर सेंटर, क्लाराचे वाणिज्य महाविद्यालय, दुसरी बुध्द लेन, वर्सोवा, मुंबई | बीकॉम (बँकिंग ॲण्ड इन्शरन्स बीकॉम (अकौंटिंग ॲण्ड फायन |
| ८. | जीवनदीप शिक्षण संस्था, पोई संचालित कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, गोवेली, जि.ठाणे | बीएमएस बीएमएम (मराठी मा |
| ९. | महाराणा प्रतापसिंह शिक्षण प्रसारक मंडळाचे आनंदीबाई रावराणे कला व वाणिज्य महाविद्यालय, वैभववाडी, जि.सिंधुदुर्ग | वाणिज्य शाखा |
| १०. | मातोश्री कानबाई, लालबाई आणि मोतीबाई लोहाना कन्याशाळा आणि बालिकागृहाचे बी.ए.अमलानी वाणिज्य आणि अर्थशास्त्र महाविद्यालय आणि मातोश्री मानेकबाई रणछोडदास नथवानी कला महाविद्यालय, प्लॉट नं.यू/९, एनएस रोड नं.६, जेव्हीपीडी स्कीम, जॉगर्स पार्कच्या समोर, विलेपार्ले (प.), मुंबई-५६ | कला व वाणिज्य |
| ११. | दि बॉम्बे सॅलिसियन सोसायटीचे डॉन बॉस्को इन्स्टिटयूट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी, प्रीमियर ऑटोमोबाईल्स रोड, कुर्ला (प.), मुंबई-७० | बीएमएस बीएससी(आयटी) बीएमएम (इंग्रजी माध्यम) |
| १२. | दार उल रेहमत ट्रस्टचे ए.इ.कालसेकर डिग्री कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स ॲण्ड सायन्स, भारत ग्रेट फॅक्टरी जवळ, डावला, मुंब्रा, जि.ठाणे | बीएससी (आयटी) बीएमएस |
| १३. | विद्याप्रसारक मंडळाचे कला व विज्ञान महाविद्यालय, किन्हवली, ता.शहापूर, जि.ठाणे | बीएमएस |
| १४. | पंकज पां. तिजारे महाविद्यालय, वेलतूर, ता.कुही, जि.नागपूर | बीए (मराठी, इंग्रजी, इंग्रजी वाड.मय, मराठी वाड.मय, राज्यशास्त्र, भूगोल, समाजशास्त्र अर्थशास्त्र) |
| १५. | कॉलेज ऑफ कॉम्प्युटर ॲण्ड मॅनेजमेंट स्टडीज ॲण्ड रिसर्च, नागपूर, ता.जि.नागपूर | बीकॉम (कॉम्प्युटर ॲप्लिकेशन बीबीए, पीजीडीसीसीए |
| १६. | स्व.ॲड.एस.डी.देशमुख बीसीए महाविद्यालय, भोकरदन, ता.भोकरदन, जि.जालना | एमसीएम एमकॉम एमएससी (गणित) |
| १७. | दगडोजीराव देशमुख कला महाविद्यालय, वाळुंज, ता.गंगापूर, जि.औरंगाबाद | विज्ञान व वाणिज्य |

| | | |
|---|---|---|
| १८. | तुळशीरामजी जाधव कला महाविद्यालय, लाखाळा, वाशिम | बीएससी भाग-१ (इंग्रजी, मराठी, फिजिक्स, सीपीए, एमपीएच, पीसीएच, आयएनसी, बॉटनी, झूलॉजी) |
| १९. | ऋषिकेश शिक्षण प्रसारक मंडळ, नवी मुंबई संचालित श्री.डी.डी.विसपुते कॉलेज ऑफ सायन्स ॲण्ड कॉमर्स, देवाद विचुंबे, ता-पनवेल, जि-रायगड | बीएससी (हॉस्पिटॅलिटी स्टडीज) |

**अटी व शर्ती:-**

I. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानार्थ मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

II. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

III. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी ३० ऑगस्ट पर्यंत करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

IV. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या युजीसी ( ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनीव्हर्सीटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहीत केलेल्या निकषांची पुर्तता केल्याशिवाय संबंधित विद्याशाखांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

V. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

VI. नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी सन २०१०-११ व २०११-१२ मध्ये NAAC ॲक्रीडीएशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळविल्यास सदर विद्याशाखा मान्यता आपोआप रद्द होईल.

VII. महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३(५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी देण्यात येत आहे. ही मान्यता फक्त शैक्षणिक वर्ष २०१०-११ पूरतीच मर्यादित राहील यावर्षी विद्याशाखा सुरु न केल्यास ही मान्यता आपोआप रद्द होईल.

२. अ.क्र. ३८ वरील सुर्योदय ग्रामिण विकास संस्थेचे छत्रपती शिवाजी कॉलेज ऑफ कॉम्प्युटर सायन्स ॲण्ड मॅनेजमेंट अंबेजोगाई, जिल्हा बीड या महाविद्यालयाने शैक्षणिक वर्ष २००९-१० करीता प्रस्ताव सादर केला असला तरी संबंधित संस्थेच्या याचिकेवर मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांनी दि. २५.११.२००९ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन संस्थेच्या प्रस्तावास शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासुन मंजूरी देण्यात येत आहे.

३. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्य शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभ सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाब पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शि महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी विद्याशाखांबाबतचा नियतकालिक आढावा घेवून विद्याशाखेसाठी मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर विद्या रद्द समजून तसे शासन व विद्यापीठच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

५. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त संगणक संकेतांक २०१००७१७२१३४१७००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सदाशिव शिवदास)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)

C:\Documents and Settings\hp\My Documents\Shivdas\Mashi x\GR\GR-Faculty.doc